**सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरिता ई-प्रिझन प्रणाली कार्यान्वित करणेकामी राज्यातील सर्व कारागृहांचे संगणकीकरण करणे (केंद्र हिस्सा १००%), या योजनेंतर्गत रु.८०,३०,०००/- इतक्या रकमेच्या उपकरणे खरेदी खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम ०५१८/प्र.क्र.८०/तुरुंग-२**

दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २६ जुलै, २०२४.

<u>संदर्भ-</u>

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची क्र. इप्र/मेंटेंनन्स/केंद्रशासन निधी/१०४३२/२०२३-२४/क-६, पुणे, दिनांक २०.१०.२०२३ व क्र. इप्रवि/मेंन्टेनंन्स/केंद्र शासन निधी/५२६८/२०२४/क-६,पुणे, दिनांक २७.६.२०२४ रोजीची पत्रे.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग -२, दिनांक १७.४.२०१५,
३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १.१२.२०१६,
४. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४.८.२०१७,
५. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस २०१७/प्र.क्र.२०४/उद्योग-४, दिनांक ०८.१२.२०१७,
६. गृह मंत्रालय, भारत सरकार यांचे क्र.वी-१७०१३/२९/२०१७-पीआर, दिनांक २६.३.२०१८ रोजीचे पत्र,
७. गृह विभाग, शासन निर्णय क्र. जेएलएम ०५१८/प्र.क्र.८०/तुरुंग-२, दिनांक ९.७.२०२४,
८. दिनांक १.७.२०२४ रोजी संपन्न झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र कारागृह विभागास ई-प्रिझन प्रणाली राबविण्याकरिता केंद्र शासनाकडून रु.४,३४,००,०००/- इतके अनुदान प्राप्त झाले आहे. सदर अनुदानातून ई-प्रिझन प्रणाली राबविण्याकरिता आवश्यक उपकरणांच्या खरेदी खर्चास प्रशासकीय मंजूरी मिळण्याकरिता संदर्भ क्र.१ येथील दिनांक २०.१०.२०२३ च्या पत्रान्वये प्रस्ताव शासनास प्राप्त झाला. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णयान्वये रु.३,५३,५९,८९६/- इतक्या रकमेच्या उपकरणे खरेदी खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्यात आली आहे.

२. तद्नंतर वर्धा जिल्हा कारागृहामध्ये E-Prisons (ICJS) प्रणालीसाठी LAN नेटवर्क करिता सदर योजनेंतर्गत प्राप्त उर्वरित अनुदानातून रु.८०,३०,०००/- इतक्या रकमेच्या उपकरणांच्या खरेदी खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भ क्र.१ येथील दिनांक २७.६.२०२४ च्या पत्रान्वये प्रस्ताव अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून शासनास प्राप्त झाला आहे. सदर खरेदी खर्चास तुरुंग उपविभागाकरिता गठित प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिनांक १.७.२०२४

रोजी संपन्न झालेल्या बैठकीत मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन सदर खरेदी खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

ई-प्रिझन प्रणाली कार्यान्वित करणेकामी राज्यातील सर्व कारागृहांचे संगणकीकरण करणे (केंद्र हिस्सा १००%), या योजनेंतर्गत वर्धा जिल्हा कारागृहामध्ये E-Prisons (ICJS) प्रणालीसाठी LAN नेटवर्क करिता रु.८०,३०,०००/- (अक्षरी रुपये ऐंशी लक्ष तीस हजार फक्त) इतक्या रकमेच्या खालील तक्यात नमूद उपकरणांच्या खरेदी खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र | उपकरणांचे नांव | आवश्यक नग | एकूण अंदाजित खरेदी किंमत |
|---|---|---|---|
| 1 | Firewall | 1 | Rs.48,00,000/- |
| 2 | Network Active Components Core Switch with 10G SFP Module | 1 | |
| 3 | Network Active Components Distributions Switch with 10G SFP Module | 2 | |
| 4 | Network Active Components Access Switch with 1G SFP Module | 10 | |
| 5 | Cat 6 Information Outlet | 150 | Rs 29,30,000/- |
| 6 | 1 Mtr Patch Cord | 150 | |
| 7 | 2 Mtr Patch Cord | 150 | |
| 8 | 24 Port Jack Panel | 12 | |
| 9 | 42U Rack | 1 | |
| 10 | 6U Rack | 12 | |
| 11 | Cat 6 Cable | 15000 Mtr | |
| 12 | Fiber Patch LC-LC | 25 | |
| 13 | Casing Capping 1” | 15000 | |
| 14 | OFC SM | 700 Mtr | |
| 15 | HDPE Pipe 1” | 700 Mtr | |
| 16 | LIU Loaded 12 Port | 12 | |
| 17 | Installation Job | 1 | Rs 3,00,000/- |
| **TOTAL Amount in Rupees Eighty Lakhs Thirty Thousand only.** | | | **Rs 80,30,000/-** |

२. सदर खरेदी उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १.१२.२०१६, क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.८. २०१७ व क्र. भांखस २०१७/प्र.क्र.२०४/उद्योग-४, दिनांक ०८.१२.२०१७ मधील नमूद तरतुदींच्या अनुषंगाने विहित पद्धतीचा अवलंब करुन केली जाईल याची काटेकोरपणाने खात्री करावी. तसेच, केंद्र शासनाच्या दिनांक २६.३.२०१८ रोजीच्या पत्रातील मागदर्शक सूचनांनुसार सदर उपकरणांची खरेदी करण्यात यावी.

३. यावरील होणारा खर्च सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात मागणी क्र बी-५, मुख्य लेखाशिर्ष २०५६ तुरुंग (००) (१०१) (२२) ई-प्रिझन प्रणाली कार्यान्वित करणेकामी राज्यातील सर्व कारागृहांचे संगणकीकरण करणे (केंद्र हिस्सा १००%) (कार्यक्रम) (२०५६ ०२९६) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर), या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व सदर अनुदान खर्चाबाबतचे मासिक विवरणपत्र व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व केंद्र शासनास सादर करण्यात यावे.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.२७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांस अनुसरुन सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७२६१५५६२९५६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK SADASHIV CHAVAN

Digitally signed by VINAYAK SADASHIV CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3d6fb52eeb39bf3c4a0001ceaa97736aa6fb733903d657c4d7b6e66cdadfd6fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1DB7A03BD2B7B1CF5AFDC7A4A26DC14D44297AA2B63F7493C19351A3D51630D0, cn=VINAYAK SADASHIV CHAVAN
Date: 2024.07.26 16:11:17 +05'30'

**( विनायक चव्हाण )**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
२. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव (अ. व सु.) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा, मुंबई,
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१२. कक्ष अधिकारी, अर्थ-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती, तुरुंग -२ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.